राज्यातील कृषीपंपधारक ग्राहकांच्या वीज
बिलातील इंधन व इतर समायोजन आकार (फोका)
(Fuel & other Charges Adjustment))
माफ करण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन

उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग
शासन निर्णय, क्रमांकः संकिर्ण - २००८ /प्र. क्र. १८९६ /ऊर्जा-५,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ०१ ऑक्टोबर,, २०१०

**प्रस्तावना :** मे, २००० पासून राज्यातील वीजेचे दर मा. महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाकडून ठरविण्यात येत आहेत. त्याप्रमाणे शेतकऱ्यांच्या कृषीपंपासाठी वीज पुरवठा करण्याचा दर प्रथम मे, २००० पासून महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाकडून ठरविला गेला. वीज निर्मितीचा खर्च इंधनाच्या दरावर अवलंबून असतो. इंधनाचे दर वाढल्यास वीज निर्मिती खर्चही वाढतो. त्याप्रमाणात महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी, मर्या. (यापुढे महावितरण कंपनी ) यांना वीज खरेदीसाठी अधिक दर विज निर्मिती कंपनीस द्यावा लागतो. याशिवाय काही वेळेस व्यापाऱ्यांकडून महाग दराने वीज खरेदी करणे आवश्यक ठरते. या सर्व अतिरिक्त खर्चाची तरतूद वीज ग्राहकांच्या वीज बिलात त्यांच्या नियमित वीज दरा व्यतिरिक्त महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाच्या मान्यतेने इंधन समायोजन आकार लावून केली जाते. या व्यवस्थेमुळे महावितरण कंपनीची आर्थिक स्थिती संतुलीत राहते. हा इंधन आकार सर्व वर्गातील ग्राहकांना समान दराने लावण्यात येतो.

राज्यातील वीज ग्राहकांना मा. विद्युत नियामक आयोगाने (यापुढे मा. आयोग) प्रथम दिनांक ३१/७/२००१ ला इंधन व इतर समायोजन आकार (फोका) यांची आकारणी करुन ती ग्राहकांच्या वीज बीलात समाविष्ट करण्यास व त्याची वसूली करण्यास तत्कालीन वीज मंडळाला परवानगी दिली. (फोकामध्ये इंधनाच्या दरातील बदलामुळे कंपनीच्या स्वतःच्या वीज निर्मिती तसेच वीज खरेदी खर्चामध्ये झालेला बदल, कोळसा हाताळणी इत्यादी बाबीवरील खर्चाचा समावेश होतो ) त्यानंतर मा. आयोगाने वीज दराच्या अटी व शर्ती विनियम - २००५ जारी केला. दि. १/९/०५ पासून राज्यामध्ये सदर इंधन व इतर खर्च समायोजन आकाराच्या (फोका) ऐवजी केवळ इंधन समायोजन आकार(एफसीए) लागू करण्यात आला आहे. (यामध्ये, इंधनाच्या दरातील बदलामुळे कंपनीच्या स्वतःच्या वीजनिर्मिती खर्चामध्ये तसेच वीज खरेदी

खर्चामध्ये झालेला बदल, खेळत्या भांडवलावरील व्याज, कमी वसूली, अतिरिक्त वसूलीबाबतचे समायोजन गुणक यांचा अंतर्भाव होतो )

शेतकऱ्यांना फक्त सवलतीचा वीज दरच लावावा आणि इंधन व इतर आकार (फोका) जो मे, २००० पासून लावण्यात येत आहे, तो पण माफ करावा अशी मागणी कृषी ग्राहकांकडून सातत्याने येत होती. बहुतांश कृषी ग्राहकांनी त्यांच्या वीज बीलातील फोकाची रक्कम वगळून वीज बीले भरलेली आहेत. कृषीग्राहकांची मागणी विचारात घेऊन फोकाची आकारणी कृषी ग्राहकांना करु नये अशा सूचना यापूर्वी महावितरणला देण्यात आलेल्या आहेत. त्याआनुषंगाने राज्यातील कृषीपंप धारक ग्राहकांच्या वीज बीलातील इंधन व इतर खर्च समायोजन आकार (फोका) व इंधन समायोजन आकाराच्या (एफसीए ) मे, २००० पासूनच्या थकबाकी संदर्भातील बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :** राज्यातील कृषी पंपधारक ग्राहक शेतकऱ्यांच्या वीज बिलातील मे, २००० ते मार्च, २०१० (वर्ष २००९-२०१०) अखेरपर्यंत (जुलै २००४ ते मे २००५ हा कालावधी वगळून ) आकारण्यात आलेला इंधन व इतर खर्च समायोजन आकार (फोका) / इंधन समायोजन आकार (एफसीए) माफ करण्यास तसेच त्यामुळे महावितरण कंपनीला येणाऱ्या महसूली तुटीची यथायोग्य रकमेची पूर्तता करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. महावितरण कंपनीने सादर केलेल्या वर्ष २०१०-११ च्या वार्षिक महसूल मागणी प्रस्तावावर महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाने दिलेल्या आदेशानुसार दि. ०१ एप्रिल, २०१० पासून राज्यातील कृषी ग्राहकांना त्यांच्या वीज बिलात इंधन समायोजन आकार (एफसीए) महावितरण कंपनीने यापुढे आकारावा. त्यासंदर्भात शासनाकडून कोणतेही आर्थिक सहाय्य यापुढे देण्यात येणार नाही.

३. मे, २००० ते मार्च, २०१० अखेरपर्यंतच्या (जुलै २००४ ते मे २००५ हा कालावधी वगळून ) कालावधी दरम्यान कृषीपंप धारक ग्राहकांना आकारण्यात आलेल्या इंधन व इतर समायोजन आकार (फोका) व इंधन समायोजन आकार (एफसीए) या आकाराची अंदाजे रु. १५१८.७५ कोटी एवढी रक्कम, त्यावरील संचित व्याजाची रक्कम रुपये ८९१.६९ कोटी एवढी रक्कम महावितरण कंपनी माफ करणार आहे. यांच्या आधिन राहून शासनाकडून महावितरण कंपनीला अर्थसहाय्य म्हणून तीन वार्षिक (आर्थिकवर्ष) हप्त्यात पुढीलप्रमाणे रक्कम देण्यात येईल.

**तीन वार्षिक हप्त्यात द्यावयाच्या रक्कमेचा तपशिल**

| अनु.क्र. | वर्ष | हप्ता संख्या | वितरणाची रक्कम रुपये (कोटीत) |
|---|---|---|---|
| १ | २०१०-२०११ | पहिला | ५००.०० |
| २ | २०११-२०१२ | दुसरा | ९००.०० |
| ३ | २०१२-२०१३ | तिसरा | ११८.७५ |
| एकूण | | | १५१८.७५ |

४. वरीलप्रमाणे रक्कम मंजूरीसाठी त्या - त्या आर्थिक वर्षात म्हणजेच वर्ष २०१०-११, २०११-१२ व २०१२-१३ या आर्थिकवर्षात त्या प्रमाणात अनुक्रमे रु. ५०० कोटी, रु. ९०० कोटी व रु. ११८.७५ कोटी याप्रमाणे निधी अर्थसंकल्पित करण्यात यावा.

५. कृषी पंपग्राहकांच्या मे २००० ते मार्च २०१० अखेर (जुलै २००४ ते मे २००५ हा कालावधी वगळून) या कालावधीतील फोका/एफसीए आकारापोटी शासनाकडून महावितरण कंपनीला अर्थसहाय्याची रक्कम वितरित करताना प्रत्यक्षात देय असलेली रक्कम संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांकडून प्रमाणित करुन घेण्यात यावी.

६. ज्या शेतकऱ्यांनी इंधन समायोजन आकाराची (फोका) रक्कम भरलेली असेल त्या शेतकऱ्यांना तेवढया रकमेचा परतावा देण्यात यावा किंवा त्यांच्या पुढील वीज बिलात तेवढ्या रकमेचे समायोजन करावे याबाबतची कार्यवाही महावितरण कंपनीने करावी आणि तसा अनुपालन अहवाल शासनास जून २०११, जून २०१२ व जून २०१३ मध्ये सादर करावा.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्रमांकः १०५०/व्यय १६/१० दिनांक १६ सप्टेंबर, २०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने

(सुब्रत रथो)

सचिव (ऊर्जा)

प्रति.

प्रति,

मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
मा. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव महाराष्ट्र शासन, मंत्रालय
मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
सर्व मा. अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव मंत्रालयीन विभाग, मुंबई ३२.
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी, मर्या. मुंबई -५१
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी, मर्या. मुंबई -५१
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी, मर्या. मुंबई - ५१
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनाय, महाराष्ट्र राज्य मंत्रालय, मुंबई- यांना सदरहू शासन निर्णयास प्रसिध्दी देण्याच्या विनंतीसह ५ प्रती अग्रेषित.
मा. राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
मा. मंत्री (ऊर्जा) यांचे विशेष कार्य अधिकारी
सर्व विधान मंडळ सदस्य विधान भवन मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
अवर सचिव (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय मुंबई - यांना कळविण्यात येते की, वरील मंजूरी नुसार महावितरण कंपनीस देय असलेली रक्कम त्या-त्या आर्थिक वर्षात देण्यासाठी त्याप्रमाणात निधी अर्थसंकल्पीत (सन २०१०-११ करीता आगामी अधिवेशनावेळी पुरवणी मागणीसह ) करुन मंजूर करण्याची व्यवस्था करावी.
अवर सचिव (रोख शाखा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय
सर्व उप सचिव, सर्व कार्यासन अधिकारी (ऊर्जा विभाग) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय
कक्ष अधिकारी (प्रशा-२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय- सदरहू शासन निर्णय शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्याच्या विनंतीसह अग्रेषित.
निवड नस्ती (ऊर्जा-५) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय

---